वित्त विभागाच्या अंतर्गत असलेल्या कार्यालयांमध्ये मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांच्या भेटीच्या वेळी किंवा समारंभाच्या वेळी त्यांचे स्वागत पुष्पगुच्छ न देता पुस्तक देऊन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकिर्ण- १०१५/प्र.क्र.३६६/वि.प्र.४**
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २३ ऑक्टोबर, २०१५

**शासन परिपत्रक:**

दिनांक १.१०.२०१५ रोजी विक्रीकर भवन माझगांव येथे झालेल्या विक्रीकर दिनाच्या कार्यक्रमामध्ये मा.मंत्री (वित्त) यांनी सत्कार समारंभामध्ये पाहुण्यांना पुष्पगुच्छ देण्याऐवजी उत्तम पुस्तक देऊन त्यांचा यथोचित सत्कार करावा अशा सूचना दिलेल्या आहेत. सदर सूचनेच्या अंमलबजावणीच्या दृष्टिकोनातून वित्त विभागाच्या अधिपत्याखालील सर्व आस्थापना/कार्यालये यांना सूचित करण्यात येते की, त्यांच्या कार्यालयामध्ये मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांच्या भेटीच्या वेळी अथवा अन्य समारंभाच्या वेळी त्यांचे स्वागत पुष्पगुच्छ देऊन करण्याऐवजी उत्तम पुस्तक देऊन त्यांचा यथोचित सत्कार करण्यात यावा.

२. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५१०२६१२०३५३९४०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinay Dattatray Athavale

Digitally signed by Vinay Dattatray Athavale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021b70f581cdf609b74f09b846df11e4abfb2e29aa1f3b67c8a25f414b0732e, cn=Vinay Dattatray Athavale
Date: 2015.10.26 12:06:53 +05'30'

**( वि.द.आठवले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, विक्रीकर, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई
२) संचालक, लेखा व कोषागारे,
३) संचालक, विमा संचालनालय,
४) आयुक्त, लॉटरी व अल्पबचत संचालनालय,
५) सर्व सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग,मंत्रालय
६) मा.मंत्री (वित्त) यांचे स्वीय सहायक.
७) मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे स्वीय सहायक.
८) निवड नस्ती, वित्त विभाग/ वि.प्र.४,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.